**सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/जवान यांच्या विधवा/अवलंबितांना तसेच अपंगत्व प्राप्त झालेल्या अधिकारी व जवानांना आर्थिक मदत देण्याबाबत - शहीद जवान हवलदार जोतीबा गणपती चौगुले, जि. कोल्हापुर.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०२०/प्र.क्र.७७/२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०९/०७/२०२०.

**वाचा-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/चौगुले/सैकवि-१६, दिनांक १४/०५/२०२०

**प्रस्तावना-**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सैनिकांच्या वारसांना /अपंगत्व आलेल्या सैनिकांना/तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सदस्य / त्यांच्या कुटुंबियांना संदर्भाधिन दिनांक ०२/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये आर्थिक मदत देण्यात येते. धारातीर्थी पडलेल्या जवानाच्या बाबतीत देय असलेली आर्थिक मदतीची विभागणी खालीलप्रमाणे विभागून देण्यात येते.१) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर अ) त्यांची वीरपत्नी- ६० टक्के, ब) वीरमाता- २० टक्के, वीरपिता- २० टक्के क) त्यांचे आई-वडीलांपैकी आई किंवा वडील कोणीही एक हयात असल्यास त्यांना ४० टक्के, २) शहीद सैनिक विवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्याची वीरपत्नीला १०० टक्के ३) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडीलही हयात असतील तर त्याचे आई-वडील यांच्यामध्ये समान विभागणी करुन ४) शहीद सैनिक अविवाहीत असेल आणि त्याचे आई-वडील हयात नसतील तर त्यांचे भाऊ/बहीण यांच्यामध्ये समान विभागणी करुन याप्रमाणे विभागणी करण्यात येते.

**शासन निर्णय-**

सैनिक कल्याण विभागाने दिनांक १४/०५/२०२० च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार, महाराष्ट्र राज्यातील धारातीर्थी पडलेले जवान, हवलदार जोतीबा गणपती चौगुले यांच्या अवलंबितांना आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| नाव व पत्ता | मृत्यु दिनांक, मोहिम व ठिकाण | वारसाचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| **नं.२८०२८६२-एल हवलदार, जोतीबा गणपती चौगुले,** मु. उंबरवाडी,पो. महागाव, ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापुर. | १६/१२/२०१९ नियंत्रण रेषेवरील गुरेझ सेक्टर (जम्मू काश्मीर), ऑपरेशन रक्षक. | १) श्रीमती यशोदा जोतीबा चौगुले ( वीरपत्नी) - **रु.३०.०० लाख** २) श्रीमती वत्सला गणपती चौगुले (वीरमाता) - **रु.१०.०० लाख** ३) श्री. गणपती बाळु चौगुले (वीरपिता) - **रु.१०.०० लाख** मु. उंबरवाडी,पो. महागाव, ता. गडहिंग्लज,जि. कोल्हापुर. |
| | **एकूण** | **रुपये ५०.०० /- लाख** |

२. धारातीर्थी पडलेल्या जवानास एकूण अनुज्ञेय (रू. १.०० कोटी) रक्कमेपैकी रु.५०,००,०००/- ( रु.पन्नास लाख फक्त) इतकी रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविण्यात आलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी होणारा खर्च रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लाख फक्त) हा मागणी क्र. ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ - सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४) देशांतर्गत/ सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५२६०८) ५० - इतर खर्च " या लेखाशीर्षामध्ये मंजुर तरतूदीतून अदा करण्याबाबत स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, कोल्हापूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८) /२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१५१३५९२२४१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba4183 6833b60c93758c804, serialNumber=78be615e7dd51ebb89a43e2d8f1b14979bf8f5ae2 c63e3a7fe41c5716996cd4b, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2020.07.15 14:06:50 +05'30'

**( संजीव केळुसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, कोल्हापूर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीम. यशोदा जोतीबा चौगुले (वीरपत्नी) मु.उंबरवाडी,पो.महागाव,ता.गडहिंग्लज,जि.कोल्हापुर.
११. श्रीम. वत्सला गणपती चौगुले (वीरमाता) मु.उंबरवाडी,पो.महागाव,ता.गडहिंग्लज,जि.कोल्हापुर.
१२. श्री. गणपती बाळु चौगुले (वीरपिता) मु.उंबरवाडी,पो.महागाव,ता.गडहिंग्लज,जि. कोल्हापुर.
१३. निवडनस्ती (२ प्रती).